सर्व स्वायत्त महाविद्यालयांच्या नियामक मंडळावर नामनिर्देशित करण्यात येणा-या शासन प्रतिनिधींच्या कर्तव्य व जबाबदा-यांबाबत.

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: संकिर्ण- २०२४/ प्र.क्र.२५/ विशि-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
४ था मजला, मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ मार्च, २०२४

**वाचाः** १. विद्यापीठ अनुदान आयोग (महाविद्यालयांना स्वायत्त दर्जा प्रदान करणे आणि स्वायत्त महाविद्यालयामधील दर्जा राखण्यासाठी उपाय) विनियम, २०२३ दिनांक ३ एप्रिल, २०२३

२. महाराष्ट्र शासनाचे एकरुप परिनियम क्र.३/२०२३, संकिर्ण-२०२३/प्र.क्र.९८/विशि-३, दिनांक २२.०५.२०२३

## परिपत्रक

व्यापकता-आधारित दर्जेदार शिक्षण आणि उत्कृष्टतेला प्रोत्साहन देण्यासाठी महाविद्यालयांना स्वायत्तता देणे महत्त्वपूर्ण असून उच्च शिक्षणाचा दर्जा वाढवण्यासाठी महाविद्यालयांच्या स्वायत्ततेला प्रोत्साहन देण्याची गरज आहे. महाविद्यालयांना स्वायत्त दर्जा प्रदान करणे आणि स्वायत्त महाविद्यालयामधील दर्जा राखण्यासाठी उपाय यासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाने (महाविद्यालयांना स्वायत्त दर्जा प्रदान करणे आणि स्वायत्त महाविद्यालयामधील दर्जा राखण्यासाठी उपाय) विनियम, २०२३ दिनांक ३ एप्रिल, २०२३ च्या अधिसूचनेन्वये अधिसूचित केले आहेत. सदर विनियम शासनाने स्विकारले असून सदर विनियम, २०२३ तसेच विद्यापीठ अनुदान आयोग यासंदर्भात वेळोवेळी करेल त्यासूचना सर्व संलग्न महाविद्यालये, संस्था, घटक महाविद्यालयांना लागू करण्याबाबतचे एकरुप परिनियम क्र.३/२०२३, संकिर्ण-२०२३/प्र.क्र.९८/विशि-३, दिनांक २२.०५.२०२३ च्या अधिसूचनेन्वये अधिसूचित केले आहेत.

उपरोक्त विनियम, २०२३ मध्ये नियम क्र.१२ मध्ये स्वायत्त महाविद्यालयांचे नियमनासाठीची वैधानिक प्राधिकरणाने नमूद केले आहेत. १.नियामक मंडळ, २. विद्या परिषद, ३.अभ्यास मंडळ व ४.वित्त समिती

नियम क्र.१२.३ नुसार नियामक मंडळाची रचना विषद केली असून त्यामध्ये शासनाने नामनिर्देशित केलेल्या प्रतिनिधीचा समावेश आहे. असा शासन प्रतिनिधी हा प्राध्यापकापेक्षा कमी दर्जा नसलेला शिक्षणतज्ञ किंवा उच्चशिक्षण संचालनालय/ राज्य उच्च शिक्षण परिषदेतील शासकीय अधिकारी असण्याच्या सूचना आहेत. शासनाच्या धोरणांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी शासनाचे प्रतिनिधी हे शैक्षणिक संस्था आणि शासन यांमधील महत्वाचा दुवा आहे. त्यानुषंगाने स्वायत्त महाविद्यालयांच्या नियामक मंडळावर शासनाने नामनिर्देशित केलेल्या व्यक्तींची कर्तव्ये व जबाबदाऱ्या निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

स्वायत्त महाविद्यालयांवर शासनाकडून नामनिर्देशित करण्यात येणा-या शासकीय प्रतिनिधींनी खालीलप्रमाणे कर्तव्य व जबाबदारी पार पाडणे आवश्यक आहे.

१. बैठकांना उपस्थिती :-नियामक मंडळाच्या प्रत्येक बैठकीला नियोजित असल्याप्रमाणे उपस्थित राहणे, उपस्थित राहू न शकल्यास, त्याबाबत आगाऊ माहिती शासनास व महाविद्यालयास कळविणे.

२. उच्चतम नैतिक दर्जा:-शासन प्रतिनिधी म्हणून जबाबदारी पार पाडताना कर्तव्यपरायणता, सचोटी, प्रामाणिकपणा, जाबाबदारी आणि नैतिक आचरण यांच्या सर्वोच्च दर्जाचे पालन करणे.

३. नियामक मंडळावर शासनाचे प्रतिनिधीत्व करताना स्वायत्त महाविद्यालयांच्यासंदर्भात शासनाची असलेली भूमिका, शासनाचा दृष्टीकोन आणि शासनाने ठरवून दिलेली प्राधान्य क्षेत्रे नियामक मंडळापर्यंत पोहचविणे.

४. स्वायत्त महाविद्यालयामध्ये राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० ची अंमलबजावणी करताना त्याची उद्दीष्ट्ये आणि त्यासंदर्भातील प्राधान्य क्षेत्रांचा पुरस्कार करण्यासाठी पुढाकार घेणे.

५. स्वायत्त महाविद्यालयाच्या गुणवत्ता वाढविण्यासंदर्भातील धोरणात्मक निर्णय प्रक्रीयेत भाग घेऊन शासन धोरणाशी सुसंगत निर्णय घेण्यासाठी नियामक मंडळात बाजू मांडणे.

६. शासनाने व संबंधित विद्यापीठाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे व धोरणांचे अनुपालन तसेच अनुपालन करताना येणा-या अडचणींचे निराकरणाच्या अनुषंगाने आवश्यक त्या उपाययोजना स्वायत्त महाविद्यालयाकडून करण्यात येत असल्याची खातरजमा करणे.

७. स्वायत्त महाविद्यालय, संबंधित विद्यापीठ आणि शासन यांच्यातील विवादात्मक बाबी व समस्यांचे निराकरण करण्यात मदत करून सामंजस्यपूर्ण संबंधांना प्रोत्साहन देणे.

८. शैक्षणिक धोरणे, निधी उपलब्धता आणि नियोजनबद्धतेच्या अनुषंगाने स्वायत्ता महाविद्यालयांना उचित दृष्टीकोन व सल्ला देणे.

९. स्वायत्त महाविद्यालयाचे अर्थसंकल्प, वार्षिक अहवालामध्ये आवश्यक त्या सर्व बाबींचा अचूक उहापोह करण्यात आला आहे, याबाबत खातरजमा करणे,

१०. अहवाल सादर करणे: नियामक मंडाळाच्या बैठका, संबंधित निर्णय, स्वायत्त महाविद्यालयांच्या कामकाजाच्या अनुषंगाने संबंधित माहिती, सूचना शासनास सादर करणे.

I. नियामक मंडळाच्या बैठकांबद्दल अहवाल शासनास सादर करणे, ज्यात स्वायत्त महाविद्यालयाच्या उच्च शिक्षण क्षेत्राच्या सर्वसाधारणपणे समस्यांबद्दल सूचनांसह महाविद्यालयांच्या शैक्षणिक गुणवत्तेत सुधारणा करावयाच्या उपाययोजनांचाही समावेश असावा.

II. स्वायत्त महाविद्यालयाच्या हिताच्या दृष्टीने योग्य नसलेला/ विद्यापीठ व राज्यशासनाच्या धोरणांचे उल्लंघन करणारा निर्णय नियामक मंडळाकडून घेतला गेल्यास त्याबाबतचा अहवाल ताबडतोब शासनास सादर करणे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१८११४६१८२५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2024.03.18 11:56:59 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. सहसंचालक, उच्च शिक्षण, सर्व विभागीय कार्यालये.
७. सहसंचालक, तंत्र शिक्षण, सर्व विभागीय कार्यालये.
८. प्राचार्य/ संचालक, सर्व शासकीय महाविद्यालये/ संस्था
९. सर्व सह/उप सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (विशि-३) , उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.